आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारलेल्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत- श्री बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाभाभा-१११९/प्र.क्र.९/टेक्स-१ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०२३.

वाचा :-
१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११ ऑगस्ट, १९९३ .
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि- ११९७/प्र. क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४ मार्च,१९९९ .
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.सूतगि-३३१६/प्र. क्र.८१/टेक्स-१(अ), दिनांक १०.जूलै, २०१७.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ), दिनांक :- ०६ मार्च, २०१८
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.बैठक-१५१६/प्र. क्र.६०/टेक्स-१(अ), दिनांक २० जूलै, २०१८.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ), दिनांक :- २१ डिसेंबर, २०१८
७. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ), दिनांक :- २४ जानेवारी, २०१९
८. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग समक्रमांक दिनांक १४ फेब्रुवारी, २०१९.
९. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.प्रकल्प-१२१५/प्र. क्र.५०/टेक्स-(अ), दिनांक १७ जून, २०२१.
१०. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.सूतगि-३३२१/प्र.क्र.४१/टेक्स-१(अ), दिनांक ३० जूलै, २०२१.
११. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.प्रकल्प-१२२२/प्र. क्र.०६/टेक्स-(अ), दिनांक ०२ डिसेंबर, २०२२.
१२.आयुक्त (वस्त्रोद्योग),नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-६(सूतगि)/शा.भा.भा./बालाजी देऊळगावराजा /१७९९/२०२३, दिनांक २४.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या व शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूतगिरण्यांनी शासनाकडे सादर केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्यासाठी शासनाने मान्यता दिलेली आहे. या

सूतगिरण्यांनी शासनास सादर केलेल्या प्रकल्प अहवालाच्या अनुषंगाने प्रकल्प उभारणीच्या कामात केलेली प्रगती लक्षात घेऊन तसेच आतापर्यंत सभासदांकडून जमा केलेले भाग भांडवल लक्षात घेऊन, श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सूतगिरणीस सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस शासनाने दिनांक २४ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेली असून, शासन निर्णय दिनांक ०२.१२.२०२२ अन्वये रु.८०८०.०० लाखाचा सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्यात आली आहे. सूतगिरणीस शासन निर्णय दिनांक १४.०२.२०१९ अन्वये रु.९८३.२४ लाख शासकीय भागभांडवल प्राप्त झालेले असून सूतगिरणीकडे दिनांक ३१.०५.२०२२ अखेर रु.४००.५९ लाख (कमाल मर्यादा रुपये ४०४.०० लाख ) इतके सभासद भागभांडवल जमा असून विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था (सूतगिरण्या), अमरावती यांच्या विनियोग दाखल्यानूसार सूतगिरणीने प्राप्त शासकीय भागभांडवलाच्या ७५% टक्के रक्कम वापर केलेली आहे. शासनाच्या धोरणानूसार प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्ज व भागभांडवलाचे (शासकीय + सभासद ) प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात देण्यात येते. यापूर्वी प्राप्त झालेले शासकीय भागभांडवल रू. ९८३.२५ लाख वजा करून, सूतगिरणी शासकीय भागभांडवल रू. २६५२.७५ लाख मिळण्यास पात्र आहे. शासन निर्णय दि.३०.७.२०२१ नुसार सूतगिरणीस दोन टप्प्यात भागभांडवल अदा करणेबाबत नमूद आहे. त्यानुसार सुधारित प्रकल्प अहवालानुसार सदर सूतगिरणीस पहिल्या टप्प्यातील रु. ८३४.७६ लाख इतके शासकीय भागभांडवल गिरणीस अनुज्ञेय ठरते. त्यानुसार सदर सूतगिरणीस **रुपये ८,३४,७६,०००/- (रुपये आठ कोटी चौतीस लाख शहयात्तर हजार फक्त)** इतके शासकीय भागभांडवल पुढील अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

**अट :- श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सूतगिरणीने आत्तापर्यंत प्रकल्पाकरीता खर्च केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.**

२. खुल्या प्रवर्गातील सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भाग भांडवल मंजूर करण्यासाठी सन २०२२-२०२३ सुधारित अंदाजामध्ये रु.६३६८.०० लाख इतकी तरतूद दर्शविण्यात आली आहे. सदर निधीपैकी श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सूतगिरणीस रुपये ८,३४,७६,०००/- (रुपये आठ कोटी चौतीस लाख शहयात्तर हजार फक्त) इतकी रक्कम शासकीय भाग भांडवल म्हणून सूतगिरणीच्या बांधकामासाठी तसेच प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबींवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी

स्वनिधीतून करील, तसेच उक्त परि.१ मधील अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासकीय भाग भांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८३/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व सूतगि-१११७/ प्र.क्र.१९३/ टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच शासकीय भाग भांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत सूतगिरणींकडून, शासन निर्णय, स.,प. व व. विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८३/ टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व दिनांक २४.३.१९९९ मधील अटी व शर्तींचे पालन होत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

२) शासकीय भागभांडवलाच्या वसुलीबाबत संदर्भ क्र. २ येथील दि. २४.३.१९९९ च्या शासन निर्णयातील अ.क्र.५ मध्ये, संदर्भ क्र.७ येथील दि. १०.७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार **सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दर शेकडा १२% प्रमाणे व्याज आकारण्यात येईल.**

३) सदर सूतगिरणींच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल संचालक वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) प्रस्तुत गिरण्यां संदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत काटेकोरपणे कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

५) संदर्भाधीन क्र.८ येथील दि.२०.७.२०१८ च्या शासन निर्णयास अनुसरुन संचालक वस्त्रोद्योग यांनी पुढील ३ महिन्यांत सदर सूतगिरणींच्या विद्यमान संचालक मंडळाकडून, प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत उपरोक्त तक्त्यातील सूतगिरणीच्या नांवासमोरील रकमेच्या १०% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही, तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम गिरणीस खर्च करता येणार नाही तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही असे बंधन संचालक वस्त्रोद्योग यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

६) प्रस्तुत सूतगिरणींच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळास ३ महिन्यांच्या आत वैयक्तिक मालमत्तेचे तारण द्यावे लागेल. नवनियुक्त

संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye-Laws मध्ये करण्याची कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी. नवनियुक्त संचालक मंडळाने तारण दिल्याशिवाय, नवीन संचालक मंडळ अस्तित्वात येणार नाही.

७) सूतगिरणींच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

८) प्रस्तुत सूतगिरणींकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

९) प्रस्तुत सूतगिरणींने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

१०) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी तशी कार्यवाही करावी.

११) सदर सहकारी सूतगिरण्यांच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबबात संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

१२) गिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच गिरणीकडे शिल्लक असलेल्या रकमेचा गिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

१३) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१४) प्रस्तुत गिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१६) सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी.

१७) सदर सूतगिरणीच्या सर्व सभासदाने त्यांचे आधार कार्ड नंबर लिंक करणे बंधनकारक राहिल.

१८) सूतगिरणीने उभारण्यासाठी ५:४५:५० या आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार सूतगिरणीने ५% सभासद भागभांडवल उभारणे बंधनकारक असून सदर सभासद भागभांगभाडवलाची रक्कम सूतगिरणीच्या प्रयोजना व्यतिरक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही. तसेच शासनाकडून सूतगिरणीला मंजूर करण्यात येणाऱ्या ४५% शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेचा विनियोग करताना सूतगिरणीने ५०% वित्तीय संस्थेकडून कर्ज म्हणून मंजूर करुन घेतलेली असणे आवश्यक आहे. शासकीय भागभांडवलापोटी प्राप्त रक्कमेचा विनियोग करताना वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाचाही विनियोग त्याच प्रमाणात करणे गिरणीवर बंधनकारक राहील.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम रुपये ८,३४,७६,०००/- (रुपये आठ कोटी चौतीस लाख शहयात्तर हजार फक्त) इतकी रक्कम श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या (SHREE BALAJI SAHAKARI SOOTGIRNI LTD., DEOOLGAONRAJA, DIST BULDHANA) या सहकारी सूतगिरणींच्या बँक आफॅ इंडिया, देऊळगांवराजा शाखा, जि.बुलढाणा (FISC Code : BKID0009247) या बँकेच्या चालू बँक खाते क्र.924720110000211 मध्ये RTGS द्वारे जमा करावी. गिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात, शासन निर्णय, क्रमांक सूतगि-१२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१(अ), दि.१५.६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

५. या सूतगिरणींस मिळालेले अर्थसहाय्य हे गिरणीचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एकरकमी वसूल करण्यात येईल. तसेच अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३ अन्वये, “३२-अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास करण्यास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे. तसेच, त्यासोबतच्या परिशिष्टातील अ. क्र. ९ येथील “३२-अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून या बाबीखालील अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे. या परिपत्रकातील भाग १ मधील अनिवार्य खर्चाशी संबंधित अ. क्र. ५, ६, ७, ८ व ९ तसेच प्राधान्य विभागाशी संबंधित अ.क्र. १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत.

७. वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२ मधील परि.३ मध्ये नमूद मार्गदर्शक सूचना व त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ येथील “३२-अंशदाने” यासमोर दर्शविण्यात आलेली तपासणी सूचीनुसार खालील प्रमाणे माहिती सादर करण्यात येत आहे

१) योजनेस प्रशासकीय मान्यता :- या सूतगिरणीचा आठव्या पंचवार्षिक योजनेत शासन अर्थसहाय्यासाठी समावेश करण्यात आला आहे.

२) निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तींची पुर्तता झाल्यानंतरच होणार आहे :- होय.

३) यापूर्वी वितरीत केलेल्या ७५% निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र - विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था (सूतगिरण्या), अमरावती यांच्या दि.१५.०२.२०२३ विनियोग दाखल्यानुसार ७५ टक्के खर्च झाला आहे.

४) यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत :- नाही.

५) निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होणार आहे :- होय

६) वस्तु खरेदी करण्यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिष्टर मध्ये घेण्यात आली असून त्यांचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत,याचे प्रमाणपत्र :- लागू नाही

७) यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जाणार आहे. :- लागू नाही.

८) आवश्यक त्या ठिकाणी नियोजन विभागाची निधी वितरणास सहमती आहे :- नियोजन विभागाने सहमती दिली आहे.

९) प्रस्तुत योजनेत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- सदर लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक तपशीलवार देयक सादर करण्यासाठी प्रलंबित नाही.

१०) निधी स्वीय प्रपंजी लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे. :- निधी संबंधीत संस्थेच्या बँक खात्यात जमा करुन शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार खर्च केला जाणार आहे.

११) नियतव्यय उपलब्धता :- सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद ८.२ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली नियतव्यय अर्थसंकल्पित आहे.

१२) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २.४.२०१८ अन्वये “३२ अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास वित्तीय अधिकार प्राप्त आहेत. तथापि आवश्यतेनुसार नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे.

१३) बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय / तांत्रिक मान्यता :- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

१४) कार्यालयीन खरेदीसाठीची कार्यपद्धती :- उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/

उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी या अटीचा उल्लेख शासन निर्णयात केला आहे.

८. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं २०२२/ प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) "मागणी क्र. व्ही-३, ४४२५- सहकारावरील भांडवली खर्च (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००)(०५) सहकारी सूतकताई गिरण्यांना भागभांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पिय अंदाजान्वये प्राप्त तरतूद रुपये ६३,६८,००,००,०००/- (रुपये त्रेसष्ठ कोटी अडुसष्ठ लाख फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित असून वित्त विभागाच्या दि. ०४.०४.२०२२ व ०८.०२.२०२३ च्या परिपत्रकानुसार ८०% निधी खर्च करण्यास परवानगी देण्यात आली आहे. सदर लेखाशीर्षाखाली आतापर्यंत रुपये २४६९.७७ लाख खर्च झाला असून रु.३८९८.२३ लाख इतका निधी शिल्लक आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सुतगिरणीने पहिल्या हप्त्याअंतर्गत अदा केलेली रक्कमेचा ७५ टक्के खर्चा विनियोग दाखला दिला आहे.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूत गिरणीने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी :- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

९. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रुपये ८,३४,७६,०००/- (रुपये आठ कोटी चौतीस लाख शहयात्तर हजार फक्त) इतक्या शासकीय भागभांडवलाचा खर्च "मागणी क्र. व्ही-३, ४४२५- सहकारावरील भांडवली खर्च (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००)(०५) सहकारी सूतकताई गिरण्यांना भागभांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१०. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.८३४.७६ लाख इतकी रक्कम श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा या सूतगिरणीच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन सूतगिरणीच्या बँक खात्यामध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. सु.ल.काठोळे, कक्ष अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. स. दि. खरात, उप सचिव (सूतगिरणी), (V०००९), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांनी सदर सहकारी सूतगिरणीस उपरोक्त शासकीय भागभांडवलाची रक्कम RTGS द्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी. बँकेचा तपशील खाली प्रमाणे आहे.

| बँकेचे नाव व शाखा | चालू खाते व क्रमांक | एम.आय.सी .आर . क्रमांक | आय .एफ. एस .सी . क्रमांक |
|---|---|---|---|
| **BANK OF INDIA, BRANCH- DEULGAON RAJA, DIST. BULDHANA** | **924720110000211** | **443013504** | **BKID0009247** |

११. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्रमांक २९४/व्यय-२, दिनांक २९.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१९१७२८१७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT G GOLE

Digitally signed by SURYAKANT G GOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=807915039b19946107c26978f204a984f59902046b59aa4af1f7053ae69e9f74, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0A6F6D0FB5278051673FB4AB0DCFFE9098509649852FFED3A3EFF7F095B40AEA, cn=SURYAKANT G GOLE
Date: 2023.03.30 19:23:15 +05'30'

**( सुर्यकांत गोळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (४ प्रतींसह), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव, १७-स/कार्यासन अधिकारी,१६-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
६. वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर
१०. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, अमरावती
१२. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बुलढाणा
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
१६. कार्यकारी संचालक, बँक ऑफ इंडिया, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा.
१७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई
१८. चेअरमन, श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी मर्या, देऊळगांवराजा, जि.बुलढाणा
१९. निवडनस्ती (टेक्स १- अ).